महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास
महामंडळाची अतिरिक्त प्राधीकृत वाहिनी
म्हणून महिला आर्थिक विकास महामंडळ
(मर्यादित) याना मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- अविम -२००२/प्र.क्र. १२७/सुधार -३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० मार्च, २००३

**वाचा :** १) शासन निर्णय,समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. इडीडी १०९८ /प्र.क्र.२०६ /सुधार -३, दि. ९ सप्टेंबर १९९८

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र. इडीडी -२००१/प्र.क्र. ६५/सुधार -३, दि. २१ नोव्हेंबर २००१

३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ (म.) यांचे पत्र क्र. मराअविविम/ २८/व्यसं, दि. ४/४/२००२

४) शासन निर्णय,सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः- :अविम २००२/प्र.क्र. १२७/सुधार -३, दि. २९ जून, २००२

५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र : शासन हमी - १०९९/प्र.क्र. ६८/शासन हमी, दि. ५/११/१९९९.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाच्या राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम, फरीदाबादची महाराष्ट्र राज्याची प्राधिकृत चॅनलायजिंग एजन्सी म्हणून संदर्भाधिन अनु.क्रमांक -४ नुसार महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाची नियुक्ती करण्यात आली आहे. अपंग महिलांची कर्ज प्रकरणे करण्याकरीता महिला आर्थिक विकास महामंडळास अतिरिक्त प्राधिकृत वाहिनी (चॅनेलायजिंग एजन्सी) म्हणून घोषित करणे व त्यास शासकीय हमी देणे हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहेः- .

२. राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम ,फरीदाबाद यांची राज्यातील अपंग महिलांची कर्ज प्रकरणे करण्याकरीता अतिरिक्त प्राधिकृत वाहिनी (चॅनेलायजिंग एजन्सी) म्हणून महिला आर्थिक विकास महामंडळ (म.) याना खालील अटीवर घेषित करण्यात येत आहे.

१) महिला आर्थिक विकास महामंडळास अतिरिक्त प्राधिकृत वाहिनी म्हणून घोषित करण्यात आल्यामुळे अपंग महिलांची कर्ज प्रकरणांची वसुली सबंधित लाभार्थ्याकडून राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगम फरीदाबाद यांना अदा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाची राहील.

२) महिला आर्थिक विकास महामंडळाने राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास निगमने घालून दिलेल्या अटींची योग्य ती शहानिशा करुन व आवश्यक ती अपंग महिलांची कर्ज प्रकरणे तयार करुन मान्यतेसाठी त्या महामंडळाकडे पाठवावीत.

३) महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ व महिला आर्थिक विकास महामंडळाच्या सर्व कर्ज, व्याज, हमीशुल्क इ. एकूण रु. १० कोटीच्या वसुलीबाबतीत एकूण संपूर्ण संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाची असेल.

(कृ.मा.प.)

३.  अपंग महिलांची कर्ज प्रकरणे तातडीने निकालात काढण्याच्या दृष्टिकोनातून महाराष्ट्र राज्य अपंग व वित्त विकास महामंडळास देण्यात आलेल्या रु. १० कोटीच्या हमीमधून रु. २ कोटीची हमी महिला आर्थिक विकास महामंडळास खालील अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून वर्ग करण्यात येत आहे:-

(१) महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाने सदर हमीची रक्क्म रु.२ कोटी (रुपये दोन कोटी फक्त) दि. ३१ /३/२००४ पर्यंत उपयोंजित करावी अन्यथा उपयोजित न झालेली रक्क्म व्यपगत करण्यात येईल.

(२) महामंडळाने राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास महामंडळ फरीदाबाद याना प्रकल्पांचे कर्ज प्रस्ताव पाठविताना असे प्रस्ताव योग्य आहेत किंवा नाही हे पाठविण्यापूर्वी तपासून पहावे.

(३) दर सहा महिन्याला कर्ज मंजूर झालेल्या प्रकल्पाच्या प्रगती बाबतची व वसुलीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती शासनास सादर करावी.

(४) उपरोक्त " वाचा" येथे उलेखित केलेल्या वित्त विभागाच्या शासन निर्णयातील अटी व शर्ती सदरील योजना राबविताना बंधनकारक राहतील.

(५) राष्ट्रीय विकलांग वित्त व विकास महामंड, फरीदाबाद यांना मंजूर करण्यात आलेल्या प्रत्येक प्रकल्पाच्या कर्ज हमीसबंधीचा प्रस्ताव महामंडळाने शासनाकडे मंजूरीसाठी पाठवावा यानुसार सदर प्रस्तावास शासन स्तरावर मंजूरी प्रदान करण्यात येईल.

(६) शासकीय हमी शुल्काचा दर प्रतिशर्त प्रतिवर्षी २.०० रुपये असून हमी शुल्काची वसुली व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई दर ६ महिन्यानी करतील. तसेच देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महामंडळाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या ३ महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

(७) महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाने शासन हमी शुल्काची रक्कम "००७५ संकीर्ण सर्वसाधारण सेवा -१०८- हमी शुल्क" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी.

२.  हा शासन निर्णय महिला व बाल कल्याण विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक : ३०९/हमी, दि. १७ ऑक्टोबर, २००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु.व.चव्हाण)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य चर्मोद्योग विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक,वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, इतर मागासवर्ग विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय विकलांग वित्त एवं विकास निगम, फरीदाबाद,

आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त, विमुक्त जाती भटक्या जमाती, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
महिला व बाल कल्याण विभाग,मंत्रालय,मुंबई,
मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय )यांचे खाजगी सचिव,
प्रधान सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्टाफ ऑफिसर,
सर्व कार्यासने, सा.न्या,सां.का.,क्री. व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती,का. सुधार -३.